**मे.महिंद्रा ॲन्ड महिंद्रा लि. यांच्या नाशिक येथील विस्तारीत इंजिनिओ (झायलो) प्रकल्पास शासनाने मंजूर केलेल्या जकात कर माफीची रक्कम देण्यासाठी निधी वितरीत करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय, क्र.साप्रोयो-२०१३/प्र.क्र.२११/उद्योग-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक - ९ नोव्हेंबर, २०१५

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय क्र.पूरक-२०१५/२०१५-१६/(९४८)/ प्रशासन-१, दिनांक ३/८/२०१५.

२) शासन परिपत्रक क्र. पूरक -२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक १/८/२०१५.

**<u>प्रस्तावना</u>:-**

मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. नाशिक या कंपनीच्या विस्तारीकरण विशाल प्रकल्पास सामंजस्य कराराच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक १६/८/२००६ पासून नगर विकास विभागाने करमाफीची अधिसूचना काढण्यात आलेल्या दिनांकापर्यंत नाशिक महानगर पालिकेने भांडवली यंत्रसामग्रीवर १०० टक्के दराने आकारलेली जकात कराची रक्कम व प्रकल्पात उत्पादन सुरू झाल्याचा दिनांक १/१२/२००८ पासून ते नगर विकास विभागाच्या दिनांक ५/१२/२००९ रोजीच्या अधिसूचनेच्या दिनांकापर्यंत कच्च्या मालावर आकारलेल्या जकात कराची ०.५ टक्के व्यतिरिक्त आकारलेली रक्कम अशी एकूण रक्कम रू. २६,७५,००,००० /- (रू. सव्वीस कोटी पंच्यात्तर लाख फक्त) अर्थसंकल्पात तरतूद करून अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. नाशिक या कंपनीच्या विस्तारीकरण विशाल प्रकल्पास सामंजस्य कराराच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक १६/८/२००६ पासून नगर विकास विभागाने करमाफीची अधिसूचना काढण्यात आलेल्या दिनांकापर्यंत नाशिक महानगर पालिकेने भांडवली यंत्रसामग्रीवर १०० टक्के दराने आकारलेली जकात कराची रक्कम व प्रकल्पात उत्पादन सुरू झाल्याचा दिनांक १/१२/२००८ पासून ते नगर विकास विभागाच्या दिनांक ५/१२/२००९ रोजीच्या अधिसूचनेच्या दिनांकापर्यंत कच्च्या मालावर आकारलेल्या जकात कराची ०.५ टक्के व्यतिरिक्त आकारलेली रक्कम अशी एकूण रक्कम रू. २६,७५,००,००० /- (रू. सव्वीस कोटी पंच्यात्तर लाख फक्त) अर्थसंकल्पात तरतूद करून अदा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी सन २०१५-२०१६ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रू. २६.७५ कोटी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या विभागाच्या अर्थसंकल्प कक्षाकडून शासन निर्णय क्र.पूरक-२०१५/२०१५-१६/(९४८)/ प्रशासन-१, दिनांक ३/८/२०१५ अन्वये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेली सदर रक्कम नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे.

३. सदर रकमेचे रु. २६.७५ कोटी (रु. सव्वीस कोटी पंच्याहत्तर लाख फक्त) आहरण व मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. या कंपनीस वितरण करण्याकरिता श्री. पो. द. देशमुख, अवर सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, यांना आहरण व संवितरण अधिकारी, तसेच श्रीमती व. मुं. भरोसे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी वरील रकमेचे देयक कोषागारात सादर करुन मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. नाशिक या विशाल प्रकल्पास सदर रक्कम अदा करण्यासाठी " मागणी क्रमांक : के- ७, मुख्य लेखाशीर्ष: २८५२ उद्योग, उप मुख्य लेखाशीर्ष: ८० सर्वसाधारण, गौण शीर्ष: १०२ औद्योगिक उत्पादकता, गट शीर्ष: ०० उप गट शीर्ष: (००) (१३) एकत्रित प्रोत्साहन योजनेंतर्गत जकात परतावा (२८५२....) (योजनेतर) " या लेखाशीर्षाखालील चालू वित्तीय वर्ष २०१५-२०१६ अंतर्गत २६.७५ कोटी इतकी वित्तीय तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन अ. क्र. २ येथील शासन परिपत्रक दिनांक १/८/२०१५ अन्वये तसचे या विभागाच्या संदर्भाधीन अ. क्र. १ येथील अर्थसंकल्प शाखेच्या दिनांक ३/८/२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीत निधी नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुपूर्द केल्याचे आदेश निर्गमित केले आहेत.

५. वरीलप्रमाणे मंजूर रक्कम अदा करण्याकरीता होणारा खर्च रु. २६.७५ कोटी " मागणी क्रमांक : के- ७, मुख्य लेखाशीर्ष: २८५२ उद्योग, उप मुख्य लेखाशीर्ष: ८० सर्वसाधारण, गौण शीर्ष: १०२ औद्योगिक उत्पादकता, गट शीर्ष: ०० उप गट शीर्ष: (००) (१३) एकत्रित प्रोत्साहन योजनेंतर्गत जकात परतावा (२८५२....) (योजनेतर) " या लेखाशीर्षाखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३३८/१५/व्यय-१६, दिनांक १६/०९/२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५११०९११२१००५११० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.11.09 11:23:17 +05'30'

**(संजय इंगळे)**
उप सचिव,
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मे.महिंद्रा ॲण्ड महिंद्रा लि. महिंद्रा टॉवर्स, दुसरा मजला, डॉ. जी एम भोसले मार्ग, वरळी, मुंबई- ४०० ०१८.
२) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५) सहायक व्यवस्थापक, पब्लिक अकाउन्टस डिपार्टमेंट( स्टेट डेबिट सेक्शन ), रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, मुंबई .
६) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
७) सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९) उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अवर सचिव ( र. व का. ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
११) रोख शाखा, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-१४/कराधान-१), मंत्रालय, मुंबई-३२.
१३) कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१४) निवड नस्ती ( उद्योग-८).